**शासकीय आदिवासी मुलांच्या/ मुलींच्या वसतिगृहांच्या बांधकामासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग,
**शासन निर्णय क्रमांक : आवगृ-२००९/प्र.क्र.११३/का.१२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : २० ऑक्टोबर, २००९.**

**शासन निर्णय** : उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, देवरी यांनी (१)शासकीय आदिवासी मुलांचे वसतिगृह, सडक अर्जुनी, जि.गोंदिया, (२) शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह, सडक अर्जुनी, जि.गोंदिया, (३) शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह, देवरी, जि.गोंदिया च्या इमारत बांधकामाची अंदाजपत्रके सादर केली आहेत. सदर अंदाजपत्रके सक्षम अधिकारी म्हणून कार्यकारी अभियंता, रोजगार हमी योजना, सार्वजनिक बांधकाम विभाग, गोंदिया व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर यांनी साक्षांकित केली आहेत.

२. तसेच उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, आमगांव, जि. गोंदिया यांनी शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह, सालेकसा, जि.गोंदिया च्या इमारत बांधकामाचे अंदाजपत्रक सादर केले आहे. सदर अंदाजपत्रक सक्षम अधिकारी म्हणून कार्यकारी अभियंता, रोजगार हमी योजना, सार्वजनिक बांधकाम विभाग, गोंदिया व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर यांनी साक्षांकित केले आहे. सदर अंदाजपत्रके सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित आहेत. सदर वसतिगृहांच्या बांधकामास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे :-

३. उपरोक्त इमारतींच्या बांधकामासाठी प्राप्त झालेली अंदाजपत्रके तांत्रिक मान्यतेसाठी सार्वजनिक बांधकाम विभागास सादर केली असता सार्वजनिक बांधकाम विभागाने अंदाजपत्रकात खालीलप्रमाणे दुरुस्त्या केलेल्या आहेत :-

**१) शासकीय आदिवासी मुलांचे वसतिगृह, सडक अर्जुनी, जि.गोंदिया,**

**२) शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह, सडक अर्जुनी, जि.गोंदिया,**

**अ)** मुख्य इमारत व आंतर व बाहय पाणी पुरवठा व मल:निस्सारण याबाबत सविस्तर अंदाजपत्रक जोडलेले आहे. तथापि, संरक्षक भित, अंतर्गत रस्ते, विहिर, पंपहाऊस, रेन वॉटर हार्वेस्टींग व सोलर वॉटर हिटर यांची तरतूद ढोबळ स्वरुपात करण्यात आलेली आहे. सदर ढोबळ तरतूद छाननीअंती योग्य करण्यात आलेली आहे.

**ब)** अंदाजपत्रकात ४% आकस्मिक खर्च, २% संगणकीकरण खर्च व ११% विद्युतीकरणाची तरतूद करण्यात आलेली आहे. ती छाननीअंती योग्य करण्यात आली आहे.

**३) शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह, देवरी, जि.गोंदिया**

**अ)** अंदाजपत्रकात ४% आकस्मिक खर्च, व २% संगणकीकरण खर्च व ११% विद्युतीकरणाची तरतूद करण्यात आलेली आहे. ती छाननीअंती योग्य करण्यात आली आहे.

**४) शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह, सालेकसा, जि.गोंदिया**

**अ)** अंदाजपत्रकातील कुपनलिका तसेच ट्रॉन्सफॉर्मरबाबतची तरतूद छाननीअंती योग्य करण्यात आलेली आहे.

**ब)** अंदाजपत्रकात ४% आकस्मिक खर्च, २% संगणकीकरण खर्च व ११% विद्युतीकरणाची तरतूद करण्यात आलेली आहे. ती छाननीअंती योग्य करण्यात आली आहे.

४. अंदाजपत्रकात उपरोक्त सुधारणा/दुरुस्त्या करुन सुधारित अदांजपत्रकाची किंमत पुढीलप्रमाणे राहिल :-

| **अ.क्र.** | **शासकीय वसतीगृहाचे नांव** | **सुधारित अंदाजित किंमत (रु.)** |
|---|---|---|
| १ | शासकीय आदिवासी मुलांचे वसतिगृह, सडकअर्जुनी, जि. गोंदिया | १६११३९६५ |
| २ | शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह, सडकअर्जुनी, जि. गोंदिया | १६११३९६५ |
| ३ | शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह, देवरी, जि.गोंदिया | १४५९७६०१ |
| ४ | शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह, सालेकसा, जि. गोंदिया | १६९१२३६१ |

५. त्यानुसार खालील अटींच्या अधिन राहून वर नमूद केलेल्या रकमेच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

**अ)** प्रस्तुत इमारतींचे काम वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून वास्तुमांडणी नकाशा व इमारतींच्या सविस्तर नकाशास मंजूरी घेतल्यावरच सुरु करावे.

**ब)** पंपहाऊस, अंतर्गत रस्ते, संरक्षक भिंत इत्यादी कामांचा छेद नकाशा, मापे व वावांसह अंदाजपत्रकात समावेश करावा.

**क)** जागा मालकी हक्काच्या सर्व कागदपत्रकांची खातरजमा करुनच कामास सुरुवात करावी.

४. सदर शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने आणि शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक-विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५.५.२००९ मधील भाग पहिला, उपविभाग-पाच अनुक्रमांक-१ नियम १३४ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २००९१०२०१४१६३५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( ग. गो. पंचभाई )** २०/१०/०९
**शासनाचे सह सचिव**

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर
अधीक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ,नागपूर
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, गोंदिया जि. गोंदिया
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, देवरी
महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
वित्त विभाग , मंत्रालय, मुंबई.
सह सचिव/उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
आदिवासी विकास विभाग, (कार्यासन ७),मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती (का.१२)